**प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पिक (सूक्ष्म सिंचन) घटकाचा अनुसूचित जमाती प्रवर्गाचा सन २०१८-१९ चा अखर्चित निधी पुनर्जिवित करुन चालू वर्षी विनियोगात आणण्यास मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सुसिंयो-०७१९/प्र.क्र.१९० (भाग-३)/१४-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख : ०२ डिसेंबर, २०१९

**संदर्भ:-**

१) कृषी, सहकार व शेतकरी कल्याण मंत्रालय, कृषी, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, भारत सरकार यांचे पत्र क्र.११-७/२०१७- आरएफएस-III, दि. ३० एप्रिल, २०१९.
२) संचालक (फलोत्पादन) यांचे पत्र क्र.जाक्र/कृआ/फलो-४/१८-१९/निधी पुनर्जिवित/५५९/ २०१९, दि.३१ जुलै, २०१९.
३) आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्र-बीयुडी-२०१९/प्र.क्र.७/कार्यासन-६, दि.२९ नोव्हेंबर, २०१९.

**प्रस्तावना-**

प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत- प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाची राज्यात सन २०१५-१६ पासून अंमलबजावणी करण्यात येत आहे. या घटकांतर्गत केंद्र राज्य हिश्श्याच्या निधीचे प्रमाण ६०:४० असे आहे. सदर घटकाच्या अंमलबजावणीसाठी केंद्र शासनाने सन २०१८-१९ या वर्षात रु.३४३६८ लक्ष एवढा केंद्र हिश्श्याचा निधी उपलब्ध करुन दिला होता. सदर निधीपैकी अखर्चित निधी सन २०१९-२० या वर्षात खर्च करण्यास केंद्र शासनाने संदर्भाधीन दि.३० एप्रिल, २०१९ च्या पत्रान्वये मान्यता दिलेली आहे. सन २०१८-१९ या वर्षात उपलब्ध झालेल्या केंद्र हिश्श्याच्या निधीपैकी रु.७७१२ लक्ष निधी दि.१ एप्रिल, २०१९ रोजी अखर्चित होता. त्यापैकी रु.६२७६.२६ लक्ष एवढा निधी कृषी आयुक्तालय स्तरावर असून रु.१४३५.७४ लक्ष निधी शासन कोषागारात जमा आहे. अखर्चित निधीमध्ये अनुसूचित जमाती प्रवर्गाचा रु.६३० लक्ष निधीचा समावेश आहे. त्यापैंकी रु.३७.३७ लक्ष निधी कृषि आयुक्तालयाच्या PFMS बँक खात्यात जमा असून रु.५९२.६३ लक्ष निधी शासन कोषागारात जमा आहे. अखर्चित निधीपैकी रु.१८३.९९ लक्ष निधी चालू आर्थिक वर्षात पुनर्जिवित करुन शासन कोषागारात जमा असलेल्या निधीपैकी रु.१४६.६२ लक्ष निधी सन २०१९-२० या वर्षात खर्च करण्यासाठी आयुक्त, कृषी यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (बीडीएस) वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

१. प्रधानमंत्री कृषि सिंचन योजनेंतर्गत- प्रति थेंब अधिक पिक (सूक्ष्म सिंचन) घटकाचा अनुसूचित जमाती प्रवर्गाचा सन २०१८-१९ या वर्षातील अखर्चित निधी रु.६३० लक्ष पैंकी रु.१८३.९९ लक्ष

(रुपये एक कोटी त्र्याऐंशी लक्ष नव्याण्णव हजार फक्त) निधी चालू आर्थिक वर्षात पुनर्जिवित करुन खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधीपैकी शासन कोषागारात जमा असलेला रु.१४६.६२ लक्ष निधी (अक्षरी रुपये एक कोटी सेहचाळीस लाख बासष्ट हजार फक्त) आयुक्त (कृषि) यांना वित्तीय व्यवस्थापन प्रणालीवर (बीडीएस) वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर निधी खालील  लेखाशिर्षाखालील सन २०१९-२० च्या मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्र.टी-५,
२४०१ पीक संवर्धन,
७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना,
(०१) जनजाती क्षेत्र उपाययोजना,
(०१) (२७) प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना-प्रति थेंब अधिक पीक सुक्ष्म सिंचन
(केंद्र पुरस्कृत योजना) (केंद्र हिस्सा ६०%)
(२४०१ A६१९), ३३ अर्थसहाय्य.

४. सदर निधीचे जिल्हा निहाय वितरण करण्यास तसेच खर्चावर नियंत्रण ठेवण्यासाठी आयुक्त, कृषि यांना राज्य नियंत्रक म्हणून घोषित करण्यता येत आहे. तसेच, सदर निधीचे आहरण व संवितरण करणेसाठी विविध स्तरावरील अधिकाऱ्यांना पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे:-

| अ.क्र | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १. | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २ | जिल्हास्तर | संबधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | संबधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी |

५. केंद्र हिश्श्याच्या प्रमाणात राज्य हिश्श्याचा आवश्यक निधी जिल्हा विकास निधीमधून उपलब्ध करुन घेण्याची कार्यवाही संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांनी करावी.

६. अनुदानाची रक्कम PFMS प्रणालीद्वारे लाभार्थ्यांच्या आधारसंलग्न बँक खात्यात जमा करण्यात यावी.

७. वितरीत करण्यात आलेला निधी अनुसूचित जमाती प्रवर्गातील लाभार्थ्यांसाठीच खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

८. सदर निधी खर्च करताना केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत- प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाच्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

९. सदर निधी खर्च करताना तो विहीत कार्यपद्धती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे/प्रकियाचे/वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत/C.V.C तत्वानुसार/प्रचलित शासन निर्णय/ नियम/ परिपत्रक/ तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकारांचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबधित क्षेत्रीय कार्यालयाची राहील.

१०. सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठविण्यात यावी.

११. सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभागाने संदर्भाधीन दि.२९ नोव्हेंबर, २०१९ च्या शासन निर्णयान्वये व वित्त विभागाने अनौ. सं. क्र.२२०/२०१९/व्यय-१, दि.३० ऑगस्ट, २०१९ अनव्ये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२०२१२३६१७७४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2019.12.02 12:41:17 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
२. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय,पुणे
३. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. आदिवासी आयुक्त, नाशिक.
५. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य, द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. सर्व संचालक /सह संचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१.
७. सर्व जिल्हाधिकारी.
८. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
९. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
१०. सर्व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद

११. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर/(लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेय)
१२. महालेखाकार (स्थानिय) निकाय लेखा परिक्षा व लेखा प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई- ४०००२०.
१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४. अध्यक्ष, सर्व जिल्हा परिषद
१५. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१६. वित्त विभाग (व्यय-१ वअर्थसंकल्प - १३ ) / मंत्रालय, मुंबई-३२
१७. ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१८. मा.राज्यमंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
१९. मा.मंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
२०. निवड नस्ती (कार्यासन -१४अे).